महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्या.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग

**शासन आदेश क्रमांकः मविसे-१०/प्र.क्र.२९/२०१९/आस्था-३ (अ)**
मंत्रालय, बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४००, ००१.
तारीख: १० फेब्रुवारी, २०२०.

**शासन आदेश :**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदींनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने तसेच उक्त अधिनियमाच्या कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदींनुसार खालील अधिकाऱ्यांच्या बदल्यांचे आदेश शासन देत आहे. बदलीनंतर संबंधित अधिकाऱ्यांची नियुक्ती त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | बदलीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| **औरंगाबाद विभाग** | | | |
| १. | श्री.व्ही.एस.राठोड, तत्का.गट विकास अधिकारी (रोहयो), जि.प.जालना | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, फुलंब्री, जि. प. औरंगाबाद | रिक्त पदी |
| **अमरावती विभाग** | | | |
| १. | श्री.एस.एम.पंडे, तत्का.सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, अकोला,जि.प.अकोला | सहायक प्रकल्प अधिकारी (सनियंत्रण), जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जि. प., बुलडाणा | रिक्त पदी |

२. श्री.एस.एम.पंडे यांना दि.१९.१०.२०१८ रोजीच्या आदेशान्वये निलंबीत करण्यात आले होते. निलंबन आढावा समितीने दि.०६.०७.२०१९ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने त्यांना

न्यायालयीन निर्णयाच्या व विभागीय चौकशीच्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात येत आहे.

३.उपरोक्त आदेशातील नमूद अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/ २५६७/२८/अकरा,दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

४. संबंधित विभागीय आयुक्तांनी उपरोक्त अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांच्या नियुक्तीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे. तसेच उपरोक्त अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्विकारल्याचा दिनांक शासनास कळवावा. संबंधित अधिकारी हे विहित कालावधीत नियुक्तीच्या पदावर रुजू न झाल्यास संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी विभागीय आयुक्तांमार्फत शिस्तभंग विषयक कार्यवाहीचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१०१४४२१४०२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dr Vasant Gopal Mane

Digitally signed by Dr Vasant Gopal Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=19c1f05a32104713094b1babbae721a60140a8f1f9e16ca9d8dc3eaf7de15d65, cn=Dr Vasant Gopal Mane
Date: 2020.02.10 17:33:59 +05'30'

( डॉ.वसंत माने )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत-

१. मा. मंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव.
३. मा. अतिरिक्त मुख्य सचिव (ग्राम विकास व पंचायत राज).

४.विभागीय आयुक्त, औरंगाबाद,अमरावती.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद,जालना,बुलढाणा व अकोला.
६.महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
७.संबंधित अधिकारी (द्वारा संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद).
८.कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास विभाग.
९. निवड नस्ती (कार्यासन-आस्था-३अ).